**सन १९८४ च्या दंगलीत मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसांना सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाकरीता निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. आरएलएफ-२०१९/प्र.क्र.०१/म-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- ४ जानेवारी, २०१९

**वाचा** :- महासूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.आरएलएफ-२०१८/प्र.क्र.६/म-०३,

दि. २१ फेब्रुवारी,२०१८

**प्रस्तावना:-**

१९८४ साली झालेल्या दंगलीतील बाधीत व्यक्तींना मदत देण्यासंदर्भात न्या.नानावटी यांच्या अध्यक्षतेखाली आयोग नेमण्यात आला होता. सदर आयोगाने केलेल्या शिफारशीची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने दि.१६ जानेवारी, २००६ रोजी "विशेष पॅकेज" जाहीर केले होते. या पॅकेजमधील मार्गदर्शक तत्वानुसार सदर दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी रुपये २,५००/- इतके निवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्यात आले आहे.

०२. केंद्र शासनाच्या वरील पॅकेजनुसार १९८४ च्या दंगलीतील मृत झालेल्या व्यक्तींच्या पात्र वारसांना सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाकरीता निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन १९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या व्यक्तींच्या पात्र वारसदारांना केंद्र शासनाच्या दि. १६ जानेवारी,२००६ च्या पॅकेजनुसार सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे प्रती व्यक्तीस दरमहा रुपये २५००/-(रुपये दोन हजार पाचशे फक्त ) याप्रमाणे निवृत्ती वेतन अदा करण्यासाठी याद्वारे एकूण रुपये १.२० लक्ष (रुपये एक लक्ष वीस हजार ) ऐवढा निधी वितरीत करण्यास शासन मंजूर देण्यात येत आहे. या एकूण निधीपैकी विभागीय आयुक्त नाशिक यांना रुपये ६०,०००/-(रुपये साठ हजार फक्त ) व विभागीय आयुक्त अमरावती यांना रुपये ६०,०००/- (रुपये साठ हजार फक्त) इतक्या रकमेचे वितरण करण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च, "मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशीर्ष-२२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००, इतर कार्यक्रम- २००(०१) (०४) १९८४ च्या दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना निवृत्ती वेतन-(२२३५-ए ३२९) (दत्तमत) या मुख्य लेखाशीर्षाखालील सन २०१८-१९ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विभागीय आयुक्त, नाशिक व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रुपये २,५००/- याप्रमाणे निवृत्तीवेतन देय असून, त्यानुसार माहे एप्रिल, २०१८ ते माहे मार्च, २०१९ या कालावधीतील निवृत्तीवेतन पात्र वारसदारांच्या हयातीची खात्री केल्यानंतर एकरक्कमी तात्काळ अदा करण्यात यावी.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागार/उपकोषागार यांचेकडे पाठविण्यात येणा-या बिलासोबत जोडल्या जाणा-या संगणक चिठ्ठीमध्ये ( Computer Slip ) गौण/उपशिर्षाच्या गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश नियंत्रण अधिका-यांनी दयावेत.

५. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता नियंत्रण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच, खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावे.

६. सदर प्रकरणी होणा-या खर्चाचे पत्रक विहीत कालमर्यादेत न चुकता शासनास प्राप्त होईल, याची दक्षता विभागीय आयुक्त, नाशिक व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०४१५३४१२५९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Ramchandra Bagane

Digitally signed by Dilip Ramchandra Bagane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9bdeba4f5b208a7811899a0f4522d8086dc2e6e2655bea26b70db55378254d2, serialNumber=a4ff332f80ce4e5a25f28d86597d7ac1c7ca6c95d9241be4eb51488570f63a29, cn=Dilip Ramchandra Bagane
Date: 2019.01.04 15:43:23 +05'30'

( दि.रा.बागणे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक/ अमरावती.
२. जिल्हाधिकारी, अहमदनगर/ बुलढाणा.
३. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४. महालेखापाल-२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/बुलढाणा.
७. वित्त विभाग( व्यय-९/अर्थसंकल्प-६/) मंत्रालय,मुंबई-३२.

<u>विवरणपत्र</u>

**शासन निर्णय क्र.आरएलएफ-२०१९/प्र.क्र.१/म-०३,दिनांक- ०४ जानेवारी,२०१९ सोबतचे विवरणपत्र (१९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या खालील ०४ व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रुपये २,५००/- याप्रमाणे सन २०१८-२०१९ करीता निवृत्तीवेतनाची रक्कम अदा करण्याबाबतचा तपशील)**

| अ.क्र. | महसूल विभाग | जिल्हा | मृत व्यक्तीचे नांव | वारसदाराचे नाव व नाते |
|---|---|---|---|---|
| १. | नाशिक | अहमदनगर | पिरु उर्फ पिरन हसन सय्यद | श्रीमती सुग्रबी सय्यद (आई) |
| २. | नाशिक | अहमदनगर | सतपालसिंग नंदपालसिंग | श्रीमती दर्शन कौर सतपालसिंग बाजवा (पत्नी) |
| ३. | अमरावती | बुलडाणा | टिकाराम देवजी सातव | श्रीमती कस्तुराबाई टिकाराम सातव (पत्नी) |
| ४. | अमरावती | बुलडाणा | दिनगर सिताराम डाबरे | श्रीमती सत्यभामाबाई दिनकर डाबरे (पत्नी) |

*****